२०११०२०७१८५५२४१००१

**महाराष्ट्र राज्य महानगरपालिका/ नगरपालिका आयोग (Maharashtra Municipal Regulatory Commission) स्थापन करण्यासंदर्भात विचार करण्यासाठी स्थापन केलेल्या मंत्रिमंडळ उपसमितीची पूनर्रचना**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एमएमसी-२००८/२७४/प्र.क्र.९१/०८/नवि ३२.**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक : २ फेब्रुवारी,२०११**

**वाचा :- १) शासन निर्णय क्रमांक :** एमएमसी-२००८/२७४/प्र.क्र.९१/०८/नवि ३२,दि.८जून,२०१०
**२) शासन पूरक पत्र क्र** :एमएमसी-२००८/२७४/प्र.क्र.९१/०८/नवि ३२. दि.२३जून,२०१०

**प्रस्तावना :**

राज्यातील नागरीकरणाची झपाटयाने वाढ होत असल्यामुळे महानगरपालिका/ नगरपालिका यांच्या कामाची जबाबदारी सतत वाढत आहे. महानगरपालिका/ नगरपालिकांमार्फत पुरविल्या जाणाऱ्या सुविधांच्या किमान दर्जाचे मूल्यमापन करुन उचित उपभोक्ता शुल्क निश्चित करण्यासंबंधी तसेच नागरी सुविधा पुरविणाऱ्या खाजगी संस्था व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमधील वाद सोडविण्याची जबाबदारी पार पाडण्यासाठी एका त्रयस्थ महानगरपालिका/नगरपरिषदा नियामक आयोगाची स्थापना करावी किंवा कसे याबाबत विचार विनिमय करुन अहवाल मंत्रिमंडळास सादर करण्यासाठी संदर्भाधीन दि.८ जून,२०१० च्या शासन निर्णयान्वये मंत्रिमंडळ उपसमितीची स्थापना करण्यात आलेली आहे. या समितीची पुनर्रचना करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र राज्य महानगरपालिका / नगरपालिका नियामक आयोगाची स्थापना करण्यासंदर्भात विचार विनिमय करुन मंत्रिमंडळास अहवाल सादर करण्यासाठी संदर्भाधीन दि.८ जून,२०१० च्या शासन निर्णयान्वये स्थापन करण्यात आलेल्या मंत्रिमंडळ उपसमितीची खालीलप्रमाणे पूनर्रचना करण्यास शासन मान्यता देत आहे:-

| | | |
|---|---|---|
| १ | मा.मंत्री (उद्योग, बंदरे आणि रोजगार व स्वयंरोजगार ) | अध्यक्ष |
| २ | मा.मंत्री (कृषि व पणन) | सदस्य |
| ३ | मा.मंत्री (ग्राम विकास) | सदस्य |
| ४ | मा.मंत्री सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम) | सदस्य |
| ५ | मा.मंत्री जलसंपदा ( कृष्णा खोरे पाटबंधारे महामंडळ) | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ६ | मा.मंत्री (शालेय शिक्षण) | सदस्य |
| ७ | मा.मंत्री (सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण आणि राजशिष्टाचार ) | सदस्य |
| ८ | मा.राज्यमंत्री (नगर विकास) | सदस्य |
| ९ | प्रधान सचिव-२, नगर विकास विभाग | निमंत्रक |

सदर समिती काही निवडक महानगरपालिकेचे महापौर व आयुक्त तसेच नगरपरिषदेचे नगराध्यक्ष व मुख्याधिकारी यांच्याशी विचारविनिमय करुन आपला अहवाल मंत्रिमंडळास सादर करील.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**( आ. श्रा. जिवने )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा.राज्यपाल यांचे खाजगी सचिव.
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई-३२.
मंत्री (उद्योग बंदरे आणि रोजगार व स्वयंरोजगार ) यांचे खाजगी सचिव ,मंत्रालय,मुंबई-३२.
मंत्री (कृषि व पणन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई-३२.
मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव ,मंत्रालय,मुंबई-३२.
मंत्री सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव ,मंत्रालय,मुंबई-३२.
मंत्री (जलसंपदा, कृष्णा खोरे पाटबंधारे महामंडळ) यांचे खाजगी सचिव ,मंत्रालय,मुंबई-३२.
मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव ,मंत्रालय,मुंबई-३२.
मंत्री (सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण आणि राजशिष्टाचार )
यांचे खाजगी सचिव. ,मंत्रालय,मुंबई-३२.
राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव ,मंत्रालय,मुंबई-३२.
प्रधान सचिव-२ (नगर विकास विभाग) यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई-३२.
महापौर, सर्व महानगरपालिका.
आयुक्त, सर्व महानगरपालिका.
संचालक, नगरपालिका प्रशासन, मुंबई.
सर्व नगरपालिकांचे नगराध्यक्ष.
सर्व मुख्याधिकारी.
सर्व सह सचिव / उप सचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
वेब को-ऑर्डीनेटर
निवड नस्ती, नवि-३२ (२ प्रती)